**कालमर्यादा**

अर्थसंकल्पीय अंदाज सन २००३-२००४ आणि सुधारलेले अंदाज सन २००२-२००३.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग

परिपत्रक क्रमांक-- बीजीटी १०/२००१/सीआर ११८ /बीयुडी-१,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२. दिनांक ११ ऑक्टोबर, २००२.

गृह विभागाच्या अधिपत्याखाली असलेल्या सर्व नियंत्रक अधिका-यांचे अर्थसंकल्पीय अंदाज सन २००३-२००४ आणि सुधारलेल्या अंदाज सन २००२ -२००३ याबाबत वित्त विभागाने सर्व विभाग/ कार्यालय प्रमुखांना निर्गमित केलेले त्यांचे परिपत्रक क्रमांक - अंदाज १००२/प्र.क्र.५१/ अर्थसंकल्प-१, दिनांक २१ सप्टेंबर, २००२ कडे लक्ष वेधण्यात येत आहे. सदर परिपत्रकामध्ये सचिव विभागाने सन २००३-२००४ चे अर्थसंकल्पीय अंदाज व सन २००२-२००३ चे सुधारित अंदाज तयार करतांना त्यात बिनचुक व वास्तविक स्वरुपाचे अंदाजपत्रक अर्थसंकल्पीय शिस्त, खर्चावरील नियंत्रण यासंबंधिच्या सुचनांचा उल्लेख केला आहे. या सुचनांपैकी काही सुचना लोकलेखासमिती/ अंदाजसमितीच्या शिफारशींवर आधारित आहेत. खालील सुचनांकडे प्रामुख्याने लक्ष वेधण्यात येत आहे.

(१) योजनांतर्गत योजना विषयक अंदाज :- दिनांक १ एप्रिल, २००२ पासून १० व्या पंचवार्षिक योजनेस सुरुवात होत आहे. ९ व्या योजनेचा एक भाग म्हणून चालू ठेवावयाच्या योजनांची तरतूद पंचवार्षिक योजनांतर्गत योजना या नेहमीच्या अर्थसंकल्प विषयक उपशिर्षाखाली दाखवाव्यात (अ) प्रशासकीय विभागाने/ नियंत्रक अधिका-यांनी चालू, नविन योजना अंतर्गत योजनांबाबतचे अंदाज छाननीसाठी/ वित्त विभाग/ नियोजन विभाग यांच्याकडे संमतीसाठी वेळेवर पाठवावे. संमतीनंतर त्याची माहिती अ, ब, क विवरणपत्रात व त्याचा गोषवारा ड या विवरणपत्रात निश्चितपणे दाखवावा. (याबाबतीतील मार्गदर्शक तत्वे जोडपत्रे एक मध्ये दर्शविली आहेत.) अनुसुचित जातीकरिता असणा-या विशेष घटक योजनेच्या बाबतीत होणा-या खर्चाची स्वतंत्रपणे नोंद घेण्याच्या दृष्टीने शासकीय परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक एसीसी१०८२/२६७/बीयुडी-२, दिनांक २० मे, १९८३ च्या सोबतच्या जोडपत्रात संबंधित मुख्यलेखाशिर्षाखाली नवीन उपशिर्ष दर्शविण्यात आलेली आहेत. त्यानुसार अनुसुचित जातीकरिता असलेल्या विशेष घटक योजनेच्या बाबतीत सन २००२-२००३ चे सुधारित अंदाज व सन २००३-२००४ चे अर्थसंकल्पीय अंदाज व सन २००३-२००४ चे अर्थसंकल्पीय अंदाज पाठवावेत.

(२) केंद्र पुरस्कृत/ केंद्रीय योजना अंतर्गत योजनांसाठी तरतुदीच्या नविन बाबी पृष्टयर्थ भारत सरकार/ इतर संस्थांच्या प्राधिकारपत्रांचा उल्लेख जरुर करावा.

(३) सर्व नियंत्रक अधिका-यांना विनंती करण्यात येत की, वित्त विभागाने निर्देशित केलेल्या विहित वेळापत्रकाप्रमाणे कार्यवाही करण्याची जबाबदारी सर्व नियंत्रक/ प्रशासकीय विभागाची आहे. आपण खालील तारखांच्या अगोदर साधारणतः १०-१५ दिवस आपले सन २००३-२००४ चे अर्थसंकल्पीय अंदाज व सन २००२-२००३ चे सुधारीत अंदाज गृह विभागाकडे पाठवावेत म्हणजे त्यांचे परिक्षण करुन वित्त विभागात वेळेवर पाठविणे सुलभ होईल.

(४) वित्त विभागाने ठरवून दिलेले वेळापत्रक

| बाब | शेवटची तारीख |
|---|---|
| (क) नियंत्रक अधिका-यांनी संबंधित प्रशासन विभागाना, वित्त विभागास थेट पाठवावयाच्या प्रतीसह विहित नमुन्यात सादर करावयाचे महसुली/भांडवली जमा रकमा व कायम स्वरुपाच्या योजनेतर खर्चासंबंधिचे अंदाज. | १५ ऑक्टोबर, २००२. |
| (ख) वित्त विभागास व नियोजन विभागास थेट पाठवावयाच्या प्रतीसह नियंत्रण अधिका-यांनी संबंधित प्रशासनिक विभागाना सादर करावयाचे कायम स्वरुपाच्या खर्चाचे आणि राज्य / केंद्र योजनेखालील चालू योजनासंबंधिचे अंदाज. | १५ ऑक्टोबर, २००२. |
| (ग) वरील (क) आणि (ख) यांच्याबाबतीत प्रशासनिक विभागांनी वित्त विभागास व नियोजन विभागास ( फक्त योजनांतर्गत ) सादर करावयाचे एकत्रित अंदाज . | १ नोव्हेंबर, २००२. |
| (घ) (एक) विहित नमुन्यात प्रमाणभूत उद्दीष्टांनुसार तपशिलवार विभागणी आणि (दोन) जिल्हावार तपशिल यासह प्रशासनिक विभागाने वित्त विभागाला सादर करावयाच्या योजनेतर - भाग- १ आणि भाग-२ - नविन बाबीच्या पाच प्रती . | २ डिसेंबर २००२ |
| (ङ) वित्त विभागाला पाठवावयाच्या थेट प्रतीसह नियंत्रण अधिका-यांनी प्रशासनिक विभागाना सादर करावयाच्या पहिल्या चार महिन्याच्या प्रत्यक्ष रकमांवर आधारलेले सन २००२-२००३ चे सुधारलेले अंदाज.(जमा व खर्च ). | १५ ऑक्टोबर, २००२. |
| (च) प्रशासनिक विभागांकडून वित्त विभागाना मिळावयाचे सन २००२-२००३ चे एकत्रित चारमाहि सुधारलेले अंदाज. | १ नोव्हेंबर, २००२ |
| (छ) वित्त विभागाला पाठवावयाच्या थेट प्रतिसह नियंत्रण अधिका-यांनी प्रशासनिक विभागाना सादर करावयाच्या पहिल्या आठ महिन्याच्या प्रत्यक्ष रकमांवर आधारित सुधारलेले अंदाज (जमा व खर्च ) . | ३१ डिसेंबर-२००२ |
| (ज) प्रशासनिक विभागांनी वित्त विभागाकडे पाठवावयाचे एकत्रित आठमाहि सुधारलेले अंदाज . | ६ जानेवारी, २००३ |
| (झ) वित्त विभागाला पाठवावयाच्या थेट प्रतीसह प्रशासनिक विभागाने विहित नमुन्यातील (एक) .तपशिलवार उद्दीष्ट निहाय विभागणी आणि (दोन) जिल्हावार तपशिलासह नियोजन विभागाला नमुना इ , एफ, आणि जी मध्ये सादर करावयाच्या योजनांतर्गत भाग-१ आणि भाग- २ -नविन बाबीच्या प्रत प्रती. | जानेवारी २००३ चा दुसरा आठवडा. |
| (ण) वित्त विभागाला पाठवावयाच्या प्रतीसह नियंत्रण अधिका-यांनी प्रशासनिक विभागाला सादर करावयाचे पहिल्या ९ महिन्याच्या प्रत्यक्ष रकमांवर आधारीत सुधारलेले अंदाज. (जमा व खर्च ) | ३१ जानेवारी, २००३ |
| (ट) प्रशासनिक विभागांनी वित्त विभागाला पाठवावयाचे एकत्रित नऊ माहि सुधारलेले अंदाज. | ७ फेब्रुवारी, २००३ |
| (ठ) नियंत्रण अधिका-यांनी प्रशासनिक विभागाना द्यावयाची वाणिज्यीक किंवा अर्ध वाणिज्यिक स्वरुपाचा व्यवहार करणा-या महत्वाच्या योजनाचे आर्थिक अंदाज दर्शविणा-या विवरणपत्राशी संबंधीत अशी माहिती. | १५ जानेवारी, २००३ |

| | |
|---|---|
| (ड) नियंत्रण अधिका-यानी अर्थसंकल्प विषयक निवेदनात समाविष्ट करण्यासाठी प्रशासनिक विभागाना सादर करावयाची वाणिज्यिक उपक्रमातील शासकिय गुंतवणूक विषयाची माहिती. | १५ जानेवारी, २००३ |
| (ढ) प्रशासकिय विभागानी वित्त विभागाला सादर करावयाची स्वीकृत सुधारलेले अंदाज आणि स्वीकृत नविन बाबींचा खर्च यांचा समावेश असलेली वरील (झ) (ठ) आणि (ड) या उप परिच्छेदांच्या संबंधातील एकत्रित विवरणपत्र | ३१ जानेवारी २००३ |

५. सन २००२-२००३ चे सुधारित अंदाजपत्रक तयार करताना जमा व खर्चाच्या प्रगतीच्या योग्य व नियंत्रित माहितीवर सुधारित अंदाज आहेत याची प्रशासकिय विभागानी खात्री करावी. तसेच जमा व खर्च यांच्या मूळ अंदाजातील तफावती संबंधिचे तपशिलवार समर्थन सुधारीत अंदाजपत्रकात असावेत यासाठी शासकिय परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक बीजीटी-१३०४/२२६/बीयुकी-२, दिनांक ३० मे, १९९४ मध्ये निर्देशित केलेल्या सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच सुधारीत अंदाज पाठविताना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक बीजीटी-१६८१/१६/बीयुकी-२, दिनांक १ मार्च, १९८२ मधिल सुचना लक्षात घ्याव्यात. तसेच ४,८, व ९ महिन्यांच्या प्रत्यक्ष खर्चावर आधारलेले असावेत. अर्थसंकल्पात समावेश असलेल्या नविन बाबींचे सुधारीत अंदाज विहित नमुन्यात (विवरणपत्र कं ) सुधारीत अंदाजाना जोडपत्र म्हणून पाठविण्यात यावे.

६. सन २००३-२००४ या वर्षाकरीता नविन बाबी सादर करताना परिपत्रकात दिलेली वित्तीय मर्यादा लक्षात घ्यावी.

७. सन २००३-२००४ या आर्थिक वर्षाकरीता अर्थसंकल्पात समावेश करावयाच्या सर्व नविन बाबीं नियोजन / वित्त विभागाने१ डिसेंबर २००२ पूर्वी योग्यप्रकारे छाननी केलेली आहे हे पहावे.

८. न्यायालयाच्या निवाडयानुसार खर्च करण्यासाठी संबंधित लेखाशिर्षाखाली "भारीत" तरतुद केली आहे ती तरतुद मागताना प्रधानशिर्षाखाली मागील ५ वर्षात अशा प्रकारचा "भारीत खर्च " लक्षात घेऊन त्यानुसार सन २००३-२००४ साठी मागणी करावी.

९. भू-संपादनाच्या प्रस्तावासाठी लागणारी तरतुद महसूल व वन विभाग व त्याचप्रमाणे सार्वजनिक बांधकाम विभाग यांच्या नियंत्रणाखाली "२०५९-सार्वजनिक बांधकामे " या लेखाशिर्षाखाली करणे आवश्यक आहे. यासाठी सन २००३-२००४ या आर्थिक वर्षाकरीता भू-संपादनासाठी आपणास तरतुदीची आवश्यकता असल्यास त्याचप्रमाणे स्वतंत्र अंदाजपत्रक सन २००३-२००४ चे (३प्रतीत) योग्य त्या समर्थनासह/ तपशिलासह पाठवावे.

१०. पेट्रोलच्या वापरावर अत्यंत कडक असे निर्बंध घालण्याची सध्याची गरज लक्षात घेता पेट्रोलसाठी सध्या किती खर्च केला जात आहे याची माहिती "पेट्रोल, तेल व वंगण " या खर्चाचे उद्दीष्ट म्हणून जे विहित करण्यात आले आहे त्या उद्दीष्टाखाली दाखवावी. ती अन्य उद्दीष्टाखाली दाखविली जाणार नाहीत याची काळजी घेण्यात यावी.

११. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक बीजीटी-१०८३/२७९/बीयुकी-१, दिनांक ३०.६.१९८३ च्या परिच्छेदाच्या सुचनेनुसार "वेतन" या उद्दीष्टाखाली अर्थसंकल्पीय अंदाज आणि सुधारीत अंदाज पाठविताना त्यांची विभागणी (अ) वेतने, (ब) महागाई भत्ता (केंद्राप्रमाणे सुधारीत ), (क) घरभाडे भत्ता, (ड) शहर पूरक भत्ता, (इ) इतर भत्ते असे स्वतंत्ररित्या व न-चुकता निर्देशित करण्यात यावेत.

१२. लेख्यांचे संगणकीकरण झाल्यामुळे सर्व जमेच्या/खर्चाच्या प्रत्येक बाबीला आकड्याकरीता संकेतांक (डीजीटल कोड नंबर्स ) देण्यात आलेले आहेत. ते संकेतांक नमुद करण्यात यावेत. वरील सर्व सुचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( शि. शं. धुमाळे )
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
महासंचालक, लाचलुचपत विरोधी केंद्र, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, न्यायसहाय्यक वैज्ञानिक प्रयोगशाळा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासमादेशक, होमगार्डस् व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र मेरीटाईम बोर्ड, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
संचालक, सरकारी अभियोग, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासंचालक, आरोग्यसेवा, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विभागीय आयुक्त, कोकण विभाग, नवी मुंबई.
सर्व विभागीय आयुक्त,
कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
व्यवस्थापकीय संचालक, पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ मर्यादित, मुंबई.
मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग आधार, ३ रा मजला,प्रशासकीय इमारत, रामकृष्ण चेंबूरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई-४०० ०७१.
जिल्हादंडाधिकारी, (नाशिक, अहमदनगर, कोल्हापूर, सातारा, ठाणे, पुणे, सोलापूर, सांगली ).
सर्व जिल्हा सत्र न्यायाधिश व सदस्य, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण,
प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
प्रबंधक, राज्य परिवहन अपिल न्यायाधिकरण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
मुख्य महानगर दंडाधिकारी, एस्प्लनेड कोर्ट, मुंबई.
उप सचिव (विशा-२, विशा-४, विशा-१०, पीआरएस-२, रोख उपशाखा, पर्यटन, सेक-पी-१, आस्था-१, पोल-७, परिवहन-४ )
विशेष कार्य अधिकारी, राज्य मानवी हक्क आयोग,
अवर सचिव, पोल-१४, गृह विभाग.

------